एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत “बेबी केअर किट” या योजनेकरिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२१/प्र.क्र.१७०/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ सप्टेंबर, २०२१

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत एकात्मिक बाल विकास सेवा योजना कार्यक्रमाखाली महाराष्ट्र राज्यात शासकीय प्राथमिक आरोग्य केंद्र / शासकीय रुग्णालयात गरोदरपणाची नाव नोंदणी केलेल्या व त्याठिकाणी प्रसुती होणाऱ्या महिलांना पहिल्या प्रसुतीच्या वेळी त्यांच्या नवजात बालकांसाठी (मुलगा किंवा मुलगी) “बेबी केअर किट” उपलब्ध करुन देण्यात येते. त्यानुसार प्रस्तुत प्रयोजनाकरिता सन २०२१-२२ या अर्थसंकल्पिय वर्षात पुरवठा झालेल्या बेबी केअर किटची देयके अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत एकात्मिक बाल विकास सेवा योजना कार्यक्रमाखाली “बेबी केअर किट” या राज्य योजनेसाठी सन २०२१-२२ या अर्थसंकल्पिय वर्षासाठी मागणी क्र. एक्स-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, पोषण आहार, ०२- पोषण अन्न व पेय वितरण, १०१- विशेष पोषण आहार कार्यक्रम, (१७) बेबी केअर किट, (१७)(०१) बेबी केअर किट योजना (कार्यक्रम) (२२३५ C २२३) या लेखाशिर्षांतर्गत ३१ - सहायक अनुदाने या उद्दिष्टाकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.८०.०० कोटी (अक्षरी रुपये ऐंशी कोटी फ़क्त) निधीपैकी **रु. २०.०० कोटी (अक्षरी रुपये वीस कोटी फ़क्त)** इतका निधी वितरीत व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१०/ व्यय-६, दिनांक ०२.०९.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९१६१४५२१००५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2021.09.27 15:46:27 +05'30'

**(महेश वरूडकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
३) मा. मंत्री (म. व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.

६) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद
७) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई.
११) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६), मंत्रालय, मुंबई
१२) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती -का-६.